राज्यातील शासकीय धान्य गोदामांमध्ये अन्नधान्याची पोती शिवण्यासाठी लागणाऱ्या सुतळीगाठीची गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलद्वारे खरेदी करण्याबाबत मार्गदर्शक सूचना...

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : सामुग्री-३११७/ प्र.क्र. १६४/ ना.पु. १६ अ,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १७ ऑक्टोबर, २०१८.

**वाचा :** (१) शासन निर्णय,समक्रमांक दि. २५ एप्रिल, २०१८

**प्रस्तावना :-**

राज्यातील शासकीय गोदामांमध्ये अन्नधान्याच्या पोत्यांचे प्रमाणिकरण केल्यानंतर ती शिवण्यासाठी वीज उपलब्ध असलेल्या ५५० गोदामांसाठी ११०० पोती शिवण यंत्रे, हँगींग हूक व शिवण यंत्रासाठी लागणारा १,६५,०० रिळ इतका धागा यांची खरेदी प्रक्रिया पुर्ण झाली असुन त्याचा संबंधित गोदामामध्ये पुरवठा सुरु आहे. उर्वरित शासकीय गोदामांना दोन महिने पुरेल एवढ्या सुतळी गाठी गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या केंद्र शासनाच्या पोर्टलद्वारे खरेदी करण्याची प्रक्रिया पुर्ण झाली असुन मे. जिगर ट्रेडर्स हे न्युनतम निविदाकार निश्चित करण्यात आले आहेत. त्यांच्याकडुन सुतळीचा पुरवठा लवकरच सुरु करण्यात येईल. सदरची खरेदी प्रक्रिया अधिक सुलभ व्हावी या दृष्टीकोनातून पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

**परिपत्रक:-**

१. संदर्भाधीन शासन निर्णयातील परिच्छेद क्र. ७ नुसार शासनाच्या वतीने यशस्वी पुरवठादारासोबत करारनामा करण्यासाठी नियंत्रक शिधावटप व संचालक, नागरी पुरवठा, चर्चगेट, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे अशी तरतुद आहे. यासंदर्भात GeM पोर्टलच्या संबंधितांशी चर्चा केली असता, GeM पोर्टलवर निविदा निश्चित झाल्यानंतर यशस्वी निविदाकारास Online contract पाठविण्यात आलेले आहे. त्यामध्ये अटी व शर्ती विहित करण्यात आलेल्या आहेत. त्यामुळे वेगळ्याने करारनामा करण्याची आवश्यकता नाही.

२. संदर्भाधीन शासन निर्णयातील परिच्छेद क्र. ४.१ मध्ये पुरवठादारास उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दि. १ डिसेंबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयासोबतच्या नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र. ४.६ मधील तरतूदीनुसार खरेदी मुल्याच्या ३% अनामत

रक्कम करारनाम्यासोबत धनाकर्षाद्वारे वित्तीय सल्लागार व उपसचिव यांचे नावे जमा करावी लागेल अशी तरतुद आहे. यशस्वी पुरवठादाराने सदर अनामत रक्कम EPBG (Electronic Performance Bank gurantee) मार्फत Online GeM Portal वर अपलोड केली आहे त्यामुळे वेगळ्याने अनामत रक्कम स्विकारण्याची आवश्यकता नाही. त्याचा SFMS (security Finance Message Service ) Primary व Secondary buyer यांना पाठविण्यात आला आहे . Primary व Secondary buyer यांनी त्यांची कार्यवाही पूर्ण केल्यानंतर त्यांच्या बँकेची कार्यवाही पुर्ण होईल, त्यानंतर पुरवठादारास GeM Portal वरुन Bill (E-way) Genrate होईल ही प्रक्रिया पुर्ण झाल्यावरच प्रत्यक्ष पुरवठा सुरु होऊ शकेल त्यामुळे पुरवठ्याच्या ४५ दिवसांचा कालावधी प्रत्यक्ष EPBG ची कार्यवाही पूर्ण होऊन Bill generate केल्याच्या तारखेपासुन ४५ कामाचे दिवस इतका ग्राह्य धरला जाईल. नियंत्रक, शिधावाटप तसेच वित्तीय सल्लागार व उप सचिव यांनी ही कार्यवाही युद्ध पातळीवर पूर्ण करावी.

३. संदर्भाधीन शासन निर्णयातील परिच्छेद क्र. ६.४ मध्ये पुरवठादाराने डिलीव्हरी दिल्यानंतर, डिलीव्हरी चलनावर सुतळी गाठी ताब्यात घेणाऱ्या गोदामपाल/ गोदाम व्यवस्थापक यांच्या सही शिक्क्यानंतर डिलीव्हरी चलनावर जिल्हा पुरवठा अधिकारी/ सहाय्यक जिल्हा पुरवठा अधिकारी/ अन्नधान्य वितरण अधिकारी यांनी प्रती स्वाक्षरी करुन शिक्का मारावा. संबंधित गोदामपाल / गोदाम व्यवस्थापक यांनी सुतळी गाठी आय.एस.आय. मार्क दर्जाची असल्याबाबत व ५०/६० किलो वजनाची असल्याबाबत खातरजमा करुन **परिशिष्ट-अ** मध्ये विहित केल्यानूसार प्रमाणपत्र द्यावे अशी तरतुद होती. मात्र GeM portal च्या कार्यपद्धतीशी सुसंगतता आणण्यासाठी परिशिष्ट-अ मध्ये बदल करण्यात येत असुन परिशिष्ट-अ प्रमाणे प्रमाणपत्र वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालय,मुंबई यांना सादर करण्यात यावे. त्यानुसार सुधारीत परिशिष्ट-अ ची प्रत सोबत जोडली आहे.

४. GeM Portal कार्यपद्धतीनुसार पुरवठादाराने सुतळी गाठींचा पुरवठा संबंधित जिल्हा गोदामामध्ये केल्यानंतर सामुग्री स्विकारणाऱ्या जिल्हा पुरवठा कार्यालयाने **त्याच दिवशी** GeM portal वर log in करून GeM order No. वर CRAC issue करावा.

५. GeM portal द्वारे होत असलेली खरेदी ही विहित कालावधीत व पुर्णपणे online पार पाडावयाची असल्याने, सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी या प्रक्रियेसाठी पुर्ण सहकार्य करावे व कालमर्यादेचे पालन करावे.

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८१०१७१६२४०३८७०६ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Satish Shridhar Supe

Digitally signed by Satish Shridhar Supe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Food and Civil Supply, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, cn=Satish Shridhar Supe
Date: 2018.10.17 16:31:29 +05'30'

**( सतिश श्रीधर सुपे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
२) मा.राज्य मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
३) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५) विकास आयुक्त(उद्योग), उद्योग संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
६) सर्व विभागीय आयुक्त,
७) नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
८) संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई
९) सर्व उपायुक्त (पुरवठा), विभागीय आयुक्त, कार्यालय
१०) सर्व जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगर जिल्हा वगळून)
११) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
१२) उपसंचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई.
१३) उप संचालक, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई.
१४) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
१५) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
१६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
१७) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
१८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, नागरी पुरवठा, लेखा परीक्षा परिमंडळ द्वारा: वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
२०) वित्त विभाग ( व्यय ४), मंत्रालय, मुंबई.
२१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई.
२२) निवड नस्ती/नापु-१६अ.

## परिशिष्ट- अ

(दि.२५ एप्रिल, २०१८ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद ६.४ नुसार द्यावयाचे प्रमाणपत्र)

प्रति,

वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालय,
अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई

विषय :- सुतळी गाठी जिल्ह्यासाठी प्राप्त झाल्याबाबतचे प्रमाणपत्र देणेबाबत.
संदर्भ :- शासन निर्णय क्र. सामुग्री-३११७/प्र.क्र. १६४/ना.पु.१६अ
दिनांक २५ एप्रिल, २०१८

महोदय,

प्रमाणित करण्यात येते की, मेसर्स -------------------------------- यांचेकडून या कार्यालयास दिनांक ------ रोजी ६० किलो वजनाची एक गाठ याप्रमाणे ------ इतक्या सुतळी गाठी सुस्थितीत प्राप्त झाल्या आहेत. सदरची सुतळी गाठी आय.एस.आय. मार्क दर्जाची असल्याबाबत खात्री करण्यात आली आहे. करीता प्रमाणपत्र देण्यात येत आहे.

दिनांक

स्वाक्षरी/-
जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी

गोल शिक्का